**सन २०१८-१९ मध्ये कृषी उन्नती योजना-एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (MIDH) अंतर्गत राष्ट्रीय फलोत्पादन अभियाना करिता सर्वसाधारण प्रवर्गाचा दुसऱ्या हप्त्याचा रुपये ६७.५० कोटी निधी वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्ध विकास व मत्स्य व्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र.राफअ-२०१८/प्र.क्र.१६८/९-अे**
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०७ फेब्रुवारी, २०१९

**संदर्भ** : १) कृषि व पशुसंवर्धन दुग्धव्यवसाय मत्स्यव्यवसाय विभाग, शासन निर्णय क्र.राफअ-२०१८/प्र.क्र.१६८/९अे, दि.०६/०६/२०१८

२) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३ दि.२ एप्रिल, २०१८ व दि.२५ जानेवारी २०१९

३) केंद्रशासनाच्या कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभागाचे पत्र क्र.F.No. १८-२४/२०१७-MIDH, ३० जानेवारी २०१९ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

एकात्मिक फलोत्पादन अभियान ,फळे, भाजीपाला, कंदमुळे, मश्रूम, मसाले, फूल, सुगंधी वनस्पती, नारळ, काजू, कोको आणि बांबू इ. उत्पादनांच्या चतुरस्त्र विकासाकरिता राबविण्यात येणारी केंद्रपुरस्कृत योजना आहे. सदर योजना सन २०१५ -१६ पासून केंद्र व राज्य हिस्सा ६०:४० या प्रमाणात राबविण्यात येत आहे.

सन २०१८-१९ मध्ये राज्यात कृषि उन्नती योजना-एकात्मिक फलोत्पादन विकास अभियानांतर्गत राष्ट्रीय फलोत्पादन अभियान राबविण्यासाठी रु. २६३३३ लाख व सन २०१७-१८ मधील रु. ६९४१.५६ लाख शिल्लक निधी अशा एकूण रु. ३३२७४.५६ लाख रकमेच्या वार्षिक तृतीय आराखडयास केंद्र शासनाने मंजूरी दिली आहे. त्यास अनुसरून सदर योजनेस संदर्भाधीन क्र.१ च्या शासना निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिलेली आहे. तसेच पहिल्या हप्त्यापोटी सर्वसाधारण प्रवर्गासाठी केंद्र हिस्सा रु. ४६१७ लाख व समरुप राज्य हिस्सा रक्कम रु. ३०७८ लाख असा एकूण रु. ७६९५ लाख निधी वितरित केला आहे.

संदर्भाधीन क्र.३ च्या पत्रान्वये केंद्र शासनाने सदर अभियानाकरिता दुसऱ्या हप्त्याचा केंद्र हिश्श्याचा रू.४०५०.०० लाख निधी मुक्त केला आहे. त्यास अनुसरून सन २०१८-१९ करिता एकात्मिक फलोत्पादन विकास अभियानाकरिता सर्वसाधारण प्रवर्गाचा दुसऱ्या हप्त्याचा केंद्र हिस्सा रु. ४०५०.०० लाख व समरूप राज्य हिस्सा रू.२७००.००लाख असा रू.६७५०.००लाख निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यास अनुसरुन शासन आता पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

१. केंद्र शासनाने संदर्भाकित दिनांक ३०.०१.२०१९ रोजीच्या पत्रान्वये सन २०१८-१९ करिता एकात्मिक फलोत्पादन विकास अभियानाच्या दुसऱ्या हप्त्याचा केंद्र हिस्स्याचा ४०५०.०० लाख (रुपये चाळीस कोटी पन्नास लाख फक्त ) निधी वितरित केला आहे. या शासन निर्णयान्वये सर्वसाधारण प्रवर्गाचा केंद्र हिस्सा रुपये ४०५०.०० लाख (रुपये चाळीस कोटी पन्नास लाख) व त्या समरुप राज्य हिस्सा ४० टक्के म्हणजे २७००.०० लाख (रुपये सत्तावीस कोटी) असा एकूण रुपये ६७५०.०० लाख (रुपये सदुसष्ट कोटी पन्नास लाख ) निधी पुढीलप्रमाणे वितरित करण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| केंद्र हिस्सा (६० टक्के) | राज्य हिस्सा (४० टक्के) | एकूण |
|---|---|---|
| ४०५०.०० | २७००.०० | ६७५०.०० |

२. सदर निधी खालील नमूद केलेल्या सर्वसाधारण प्रवर्गाच्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा (६० टक्के) | राज्य हिस्सा (४० टक्के) |
|---|---|---|
| सर्वसाधारण | मागणी क्र. - डी -०३<br>२४०१ - पीक संवर्धन<br>(११९) - बागायती व भाजीपाला पिके<br>(०३) - रोपमळे<br>(०३) (३७) - कृषि उन्नती योजना -एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (कें.पु.यो.) (केंद्र हिस्सा ६० टक्के) (सर्वसाधारण)<br>३३-अर्थसहाय्य<br>(२४०१ ९५६३) | मागणी क्र. - डी -०३<br>२४०१ - पीक संवर्धन<br>(११९) - बागायती व भाजीपाला पिके<br>(०३) - रोपमळे<br>(०३) (३४) - कृषि उन्नती योजना - एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (कें.पु.यो.)(राज्य हिस्सा ४० टक्के) (सर्वसाधारण)<br>३३ - अर्थसहाय्य<br>(२४०१ ४५०७) |

३. अभियानाकरिता वितरित करण्यात आलेला निधी कोषागारातून आंहरित करण्याकरिता लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. एकात्मिक फलोत्पादन विकास अभियानांअंतर्गत राष्ट्रीय फलोत्पादन अभियान राबविण्यासाठी, राज्य स्तरीय व मंडळ कार्यालयातील तसेच जिल्हा स्तरावरील कार्यालयातील प्रशासकीय खर्च, सल्लागार, संगणकीकरण, आकस्मिक खर्च इत्यादीसाठी, योजनेवरील खर्चाचे ५ टक्के प्रमाणात निधीचा वापर करण्यात यावा.

५. सदर योजनेंतर्गत वेळोवेळी उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त कृषि पुणे यांनी शासनास सादर करावे.

६. योजनेअंतर्गत वितरित निधी जिल्हा स्तरावरुन खर्च करण्यात यावा.

७. प्रस्तुत आदेश शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३ दि.२ एप्रिल, २०१८ व दि.२५ जानेवारी २०१९ नुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०७१५०३४९०५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ashok Maroti Atram

Digitally signed by Ashok Maroti Atram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, serialNumber=5f7eca1f400d866ea34324cea1a547aa04f0da0794a00bee126e8678172a15c5, cn=Ashok Maroti Atram
Date: 2019.02.07 15:05:33 +05'30'

**( अशोक आत्राम )**
**सहसचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रती :-**

१. मा.मंत्री (कृषी), मुंबई यांचे खाजगी सचिव,
२. मा. कृषि राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे खाजगी सचिव,
३. सर्व सन्माननीय विधानसभा / विधानपरिषद सदस्य,महाराष्ट्र राज्य.
४. मा.सचिव, (कृषि ) कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई,
५. मा.अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२,
६. मा.अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, नियोजन विभाग/आदिवासी विकास विभाग/सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय, मुंबई ३२,
७. आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
८. व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ,साखर संकुल,शिवाजी नगर,पुणे,
९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पणन मंडळ, पुणे,
१०. संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
११. राज्यातील सर्व विभागीय कृषि सह संचालक,
१२. राज्यातील सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
१३. विविध राष्ट्रीय मंडळावरील महाराष्ट्राचे सदस्य म्हणून कार्यरत असलेल्या जिल्ह्यातील व्यक्ती,
१४. राज्यातील फळे/फुले उत्पादक संघाचे प्रतिनिधी,
१५. निवडनस्ती, कार्यासन ९- अे.